**घाटकोपर, मुंबई येथील बेकायदेशीर फलक कोसळून झालेल्या घटनेची चौकशी करण्याकरिता गठीत न्या. दिलीप भोसले समितीच्या अध्यक्ष व इतर सदस्यांचे मानधन निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः E-१०४०६५९/H.D.५९०२१/५१/२०२५/विशा-२**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई.
दिनांक : २८ मार्च, २०२५.

वाचा :- १) गृह विभाग, शासन निर्णय, क्र : कल्याण-०५२४/प्र.क्र.१३१/पोल-७, दि.१०/०६/२०२४.
२) गृह विभाग, शासन निर्णय, क्र : HD-३२०११/४/२०२४-O/o JT.SECY६- MHD(PG)- Home Department, दि.२९.०७.२०२४.
३) गृह विभाग, शासन निर्णय, क्र : HD-३२०११/४/२०२४-O/o JT.SECY६- MHD(PG)- Home Department, दि.११.०२.२०२५.
४) न्या. दिलीप भोसले चौकशी समितीचे अध्यक्ष यांचे दि.०४.०३.२०२५ रोजीचे देयक.
५) न्या. दिलीप भोसले चौकशी समितीचे वकील यांचे दि.१०.०३.२०२५ रोजीचे देयक.
६) न्या. दिलीप भोसले चौकशी समितीचे प्राध्यापक/ स्ट्रक्चरल अभियंता यांचे दि.२७.०२.२०२५ रोजीचे देयक.
७) न्या. दिलीप भोसले चौकशी समितीचे खाजगी स्टेनोग्राफर यांचे दि.१२.०३.२०२५ रोजीचे देयक.

**प्रस्तावना :-**

दिनांक १३/०५/२०२४ रोजी मुंबईमधील घाटकोपर येथील बेकायदेशीर फलक कोसळून झालेल्या घटनेची उच्चस्तरीय चौकशी करण्याकरिता संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये श्री. दिलीप भोसले, मा. निवृत्त मुख्य न्यायाधीश, उच्च न्यायालय यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली असून, संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये समितीची रचना व कार्यकक्षा निश्चित करण्यात आली आहे.

तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये दुर्घटनेची चौकशी करण्यासाठी नेमलेल्या सदस्यांना मदत करण्यासाठी समितीची फेररचना करण्यात आली असून, समितीला अंतिम अहवाल सादर करण्यासाठी दि.३१ मार्च, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

न्या. दिलीप भोसले चौकशी समितीच्या अध्यक्ष व इतर सदस्य यांना व्यावसायिक शुल्क/ मानधन निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

न्या. दिलीप भोसले चौकशी समितीकरिता नियुक्त अध्यक्ष व इतर सदस्य यांचे व्यावसायिक शुल्क/मानधन पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

अ) श्री. दिलीप भोसले, मा. अध्यक्ष यांना प्रतिमाह रु.६,००,०००/- याप्रमाणे मानधन/ व्यावसायिक शुल्क निश्चित करण्यात येत आहे.

आ) ॲड भानू चोप्रा, वकील यांना प्रतिमाह रु.२,००,०००/- याप्रमाणे मानधन/ व्यावसायिक शुल्क निश्चित करण्यात येत आहे.

इ) श्री. दिपंकर चौधरी, प्राध्यापक (सिव्हिल अभियांत्रिकी विभाग)/स्ट्रक्चरल अभियंता यांनी प्रति बैठक रु.७,५००/- याप्रमाणे व प्रतिलेखनासाठी रु.२५,०००/- इतके मानधन/व्यावसायिक शुल्क निश्चित करण्यात येत आहे.

ई) श्री. आनंद परब, खाजगी स्टेनोग्राफर प्रति बैठक रु.२,५००/- व प्रति सुनावणी रु.५,०००/- याप्रमाणे मानधन/व्यावसायिक शुल्क निश्चित करण्यात येत आहे.

२. उक्त खर्च हा मागणी क्र.बी-४, लेखाशीर्ष- २०५२, सचिवालय सर्वसाधारण सेवा, ०९० सचिवालय (००)(०२), विशेष चौकशी आयोग, (अनिर्वाय) (२०५२०१८८), २८-व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१४४८४४०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.03.28 14:49:49 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, गृह विभाग.**

प्रत,

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
३) अवर सचिव/कक्ष अधिकारी, रोखशाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) श्री. दिलीप भोसले, मा. अध्यक्ष, न्या. दिलीप भोसले चौकशी समिती, मुंबई.
५) मा. सचिव, न्या. दिलीप भोसले चौकशी समिती, मुंबई.
६) ॲड. भानू चोप्रा, वकील, न्या. दिलीप भोसले चौकशी समिती, मुंबई.
७) श्री. दिपंकर चौधरी, प्राध्यापक (सिव्हिल अभियांत्रिकी विभाग) / स्ट्रक्चरल अभियंता , न्या. दिलीप भोसले चौकशी समिती, मुंबई.
८) श्री. आनंद परब, खाजगी स्टेनोग्राफर, न्या. दिलीप भोसले चौकशी समिती, मुंबई.
९) निवडनस्ती, विशा-२.